**डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार आणि डॉ. एस. आर. रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता व सेवक ग्रंथमित्र पुरस्कार अटी, निकष, निवड प्रक्रिया व कार्यपध्दतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. मराग्रं-२५२५/प्र.क्र.३८/१४/साशि-५,**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ ऑगस्ट, २०१५

**वाचा :-** शासन निर्णय क्र. मराग्रं-२०११/(०४/११)/साशि-५, दि.११/०४/२०११.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्रातील जनतेचे सामाजिक, शैक्षणिक व सांस्कृतिक जीवन समृध्द करण्यासाठी व वाचन संस्कृती वृंध्दीगत होण्यासाठी राज्यातील शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांचे योगदान लाभावे यासाठी ग्रंथालयांचा गुणात्मक विकास व्हावा या ग्रंथालयाकडून राज्यातील जनतेला अधिक चांगल्या सेवा देण्यासाठी त्यांना प्रोत्साहन मिळावे या उदेशाने शासनाकडून उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालयांना डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार आणि ग्रंथालय चळवळीतील कार्यकर्ते व सेवक यांना डॉ एस.आर. रंगनाथन उत्कृष्ट कार्यकर्ता व सेवक ग्रंथमित्र पुरस्कार देवून त्यांचा सन्मान दरवर्षी करण्यात येतो.

संदर्भाकीत शासन निर्णयामधील निकषानुसार पुरस्काराची निवड करताना निवड प्रक्रियेमध्ये त्रुटी असल्याचे निदर्शनास आले. त्यामुळे पुरस्कार निवडीबाबतचा सर्वसमावेशक परिपूर्ण शासन निर्णय तयार करुन ग्रंथालय संचालनालयाच्या वेबसाईटवर ठेवण्यात आला व संबंधितांकडून हरकती व सूचना मागविण्यात आल्या. प्राप्त झालेल्या सूचनांचा समावेश करुन “डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार” आणि ग्रंथालय चळवळीतील कार्यकर्ते व सेवक यांना “डॉ एस.आर. रंगनाथन उत्कृष्ट कार्यकर्ता व सेवक ग्रंथमित्र पुरस्कार” या बाबतचा सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार” आणि ग्रंथालय चळवळीतील कार्यकर्ते व सेवक यांना “डॉ एस.आर. रंगनाथन उत्कृष्ट कार्यकर्ता व सेवक ग्रंथमित्र पुरस्कार” प्रदान करण्याच्या संदर्भातील यापूर्वीचे सर्व शासन निर्णय अधिक्रमित करुन, पुरस्काराबाबत अटी, निकष, निवडप्रकिया आणि कार्यपध्दती निश्चित करुन सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

२. पुरस्काराबाबतच्या प्राथमिक अटी व गुणवत्तेचे निकष यांची पुर्तता करणाऱ्या तसेच किमान ५० % गुण प्राप्त करणाऱ्या ग्रंथालय कार्यकर्ता व सेवक यांनाच पुरस्कारासाठी पात्र ठरविण्यात येईल. एखाद्या वर्षी प्राथमिक अटी व निकषांची पूर्तता होत नसल्यास, तसेच ज्या पुरस्कारामध्ये किमान ५० % गुण प्राप्त करणारे ग्रंथालय,

कार्यकर्ता व सेवक नसेल त्या वर्षी तो पुरस्कार दिला जाणार नाही. ग्रंथालयास एकदा डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार मिळाल्यानंतर व ग्रंथालय सेवकास/कार्यकत्यास/डॉ एस.आर. रंगनाथन उत्कृष्ट कार्यकता व सेवक ग्रंथमित्र पुरस्कार मिळाल्यानंतर पुढील दहा वर्ष सदर पुरस्कारासाठी अर्ज करता येणार नाही. प्राथमिक अटीचा भंग झाल्यास पुरस्कार व त्याअनुषंगिक सोयी/ सुविधा परत घेण्यात येतील व संबंधितावर उचित कार्यवाही करण्यात येईल.

३. डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालयांना ८ पुरस्कार आणि ग्रंथालय चळवळीतील कार्यकर्ते व सेवक यांना डॉ. एस.आर. रंगनाथन उत्कृष्ट कार्यकर्ता व सेवक ग्रंथमित्र १४ पुरस्कार असे एकूण २२ पुरस्कारांची विगतवारी खालील प्रमाणे राहील.

**अ) डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार**

| अ. क्र | ग्रंथालयाचा वर्ग | पुरस्कारांची संख्या | | पुरस्कारांची रक्कम |
|---|---|---|---|---|
| | | शहरी | ग्रामीण | |
| १ | अ - वर्ग | १ | १ | प्रत्येकी रु. ५०००० |
| २ | ब - वर्ग | १ | १ | प्रत्येकी रु. ३०००० |
| ३ | क - वर्ग | १ | १ | प्रत्येकी रु. २०००० |
| ४ | ड - वर्ग | १ | १ | प्रत्येकी रु. १०००० |
| | एकूण | ४ | ४ | |

**ब) डॉ एस.आर. रंगनाथन उत्कृष्ट कार्यकर्ता व सेवक ग्रंथमित्र पुरस्कार**

| अ.क्र. | पुरस्काराचे नाव/ ग्रंथालयाचा वर्ग | पुरस्कारांची संख्या | पुरस्काराची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | राज्यस्तरीय उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता | १ | रु. २५००० |
| २ | राज्यस्तरीय उत्कृष्ट ग्रंथालय सेवक | १ | रु. २५००० |
| ३ | प्रत्येकी महसूली विभागातील उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता | ६ | रु. १५००० (प्रत्येकी) |
| ४ | प्रत्येकी महसूली विभागातील उत्कृष्ट ग्रंथालय सेवक | ६ | रु. १५००० (प्रत्येकी) |
| | एकूण | १४ | |

४. **पुरस्काराकरीता प्राथमिक अटी :-**

अ) डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालये पुरस्कारासाठी अर्ज करण्यास/प्रस्ताव पाठविताना ग्रंथालयाला शासन मान्यता मिळाल्यापासून तीन वर्ष पूर्ण होणे आवश्यक आहे. तसेच खालील अटी पूर्ण करणाऱ्या ग्रंथालयांनी अर्जासोबत पुढील प्रमाणपत्रांच्या सत्यप्रती जोडणे बंधनकारक राहिल.

१) संस्थेची नोंदणी झालेले प्रमाणपत्र.
२) ग्रंथालयास मान्यता मिळालेला शासन आदेश.
३) ग्रंथालयास विद्यमानवर्ग प्राप्त झाल्याबाबतचे पत्र.
४) मागिल तीन वर्षाचा वार्षिक अहवाल.
५) मागिल तीन वर्षाचा अंकेक्षणअहवाल.

६) ग्रंथालयातर्फे साजरे केलेले सांस्कृतिक कार्यक्रम.

ब) डॉ एस.आर. रंगनाथन उत्कृष्ट कार्यकता व सेवक ग्रंथमित्र पुरस्कारासाठी अर्ज करण्यास/प्रस्ताव पाठविण्यास शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयात काम करणा-या सेवकाची व ग्रंथालय चळवळीत काम करणा-या कार्यकत्याची सेवा किमान पंधरा वर्ष असणे आवश्यक राहिल. तसेच खालील अटी पूर्ण करणाऱ्या कार्यकर्ता / सेवक यांनी अर्जासोबत पुढील प्रमाणपत्रांच्या सत्यप्रती जोडणे बंधनकारक राहिल.

१) ग्रंथालयशास्त्र व चळवळी विषयी प्रकाशित केलेले साहित्य.
२) नवीन ग्रंथालयांची स्थापना केली असल्यास त्याबाबतचा तपशील .
३) प्रबोधन कार्यक्रम राबविला असल्यास त्या बाबातचा तपशील .
४) विविध उपक्रमांतर्गत सहभाग असल्यास त्याबाबतची सविस्तर माहिती .
५) इतर पुरस्कार व महत्वपूर्ण काम केले असल्यास त्याबाबत पुराव्यासह तपशील .
६) सामाजिक प्रबोधनासाठी भरीव कार्य असल्यास त्याचा पुरावा .
७) पंधरा वर्ष सेवा झाल्याबाबतचा पुरावा. (ग्रंथालय सेवकास पदनिर्मिती आदेश व कार्यकत्यास कोणत्याही शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयाचा पदधिकारी असल्याचा पुरावा)

५. **पुरस्कारासाठी निवड करण्याकरिता निकष :-**

अ) **डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालये पुरस्कार-** प्राथमिक अटी ( परिच्छेद क्रमांक ३(अ)) पूर्ण करण्याऱ्या ग्रंथालयांचेच प्रस्ताव डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार निवडीसाठी विचारात घेण्यात यावेत. या पुरस्काराचे निकष परिशिष्ट **अ** ते **ड** मध्ये अंतर्भूत करण्यात आले आहेत.

**ब) डॉ. एस.आर. रंगनाथन उत्कृष्ट कार्यकता व सेवक ग्रंथमित्र पुरस्कार-** प्राथमिक अटी ( परिच्छेद क्रमांक ३ (ब)) पूर्ण करणाऱ्या ग्रंथालयांचेच प्रस्ताव डॉ. एस.आर. रंगनाथन उत्कृष्ट कार्यकर्ता व सेवक ग्रंथमित्र पुरस्कार निवडीसाठी विचारात घेण्यात येतील. या पुरस्काराचे निकष परिशिष्ट **इ** ते **फ** मध्ये अंतर्भूत करण्यात आले आहेत.

६. **पुरस्काराचे प्रस्ताव तयार करण्याची पध्दती :-**

(एक) ग्रंथालय संचालक पुरस्काराच्या निवडीसाठी राज्यातील, जिल्हा/तालुका पातळीवरील वृत्तपत्रात तसेच संकेतस्थळावरुन पुरस्काराबाबतची जाहिरात प्रसिध्दी करतील. प्रसिध्दीसाठी आवश्यक त्या इतर प्रसिध्दी माध्यामाचा वापर करण्यात यावा. पुरस्काराबाबत परिपत्रक निर्गमित करुन सर्व संबंधिताना सुचना देवून ऑनलाईन/ ऑफलाईन (हार्डकॉपी) अर्ज मागविण्यात यावे.

(दोन) पुरस्काराबाबतचा प्रत्येक प्रस्ताव हा ग्रंथालय निहाय, कार्यकर्ता निहाय व सेवक निहाय स्वतंत्र राहिल. अर्जाचा नमुना परिशिष्ट **एक** व परिशिष्ट **दोन** प्रमाणे राहिल. प्रत्येक जिल्हयातील प्रस्ताव संबंधित **जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय** यांच्या स्तरावर स्विकारण्यात येतील. प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी व प्रत्यक्ष तपासणी (Spot Verification) करण्यासाठी खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रत्यक्ष तपासणी समिती | पद |
|---|---|---|
| १ | संबंधित विभागाचे सहाय्यक ग्रंथालय संचालक | अध्यक्ष |
| २ | विद्यमान अध्यक्ष किंवा कार्यवाह, संबंधित शासनमान्य विभाग ग्रंथालय संघ | सदस्य |
| ३ | विद्यमान अध्यक्ष किंवा कार्यवाह, संबंधित शासनमान्य जिल्हा ग्रंथालय संघ | सदस्य |
| ४ | संबंधित जिल्हयाचा जिल्हा ग्रंथालय अधिकारी | सदस्य सचिव |

७. **प्रत्यक्ष तपासणी समितीचे कार्य :-** प्रत्यक्ष तपासणी समिती (Spot Verification Commitee) प्राप्त झालेल्या सर्व प्रस्तावांची छाननी करतील. छाननी मध्ये प्रस्तावामधील कागदपत्राच्या आधारे प्राथमिक अटींची पुर्तता झाली असल्याची खातरजमा करील. प्राथमिक अटी पूर्ण करणाऱ्या ग्रंथालयास प्रत्यक्ष भेट देऊन पुरस्कारासाठी निश्चित केलेल्या निकषानुसार ग्रंथालयांची तपासणी करुन गुणांकन करतील. समितीने तयार केलेली पुरस्कार निहाय गुणवत्ता यादी आणि समितीच्या बैठकीचे कार्यवृत्त याची प्रत्येकी एक प्रत प्रत्येक प्रस्तावा सोबत ठेवण्यात येईल व दुसरी प्रत सहाय्यक ग्रंथालय संचालक यांना देण्यात येईल. सहाय्यक ग्रंथालय संचालक यांनी सर्व जिल्हयांचे प्रस्ताव एकत्र करुन त्यावर आपले स्वतंत्र अभिप्राय नोंदवून विभागाचा एकत्रित प्रस्ताव ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय यांच्याकडे पाठवावा. ग्रंथालय संचालक प्राप्त झालेल्या सर्व प्रस्तावांची तपासणी करुन आवश्यक वाटल्यास समर्थनासह गुणांकनामध्ये बदल करतील व पुरस्कार निहाय एकत्रित प्रस्ताव राज्यस्तरीय निवड समिती समोर ठेवण्यासाठी शासनाकडे सादर करतील.

८. **राज्यस्तरीय निवड समिती :-** "डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालये पुरस्कार" आणि ग्रंथालय चळवळीतील कार्यकर्ते व सेवक यांना "डॉ एस.आर. रंगनाथन उत्कृष्ट कार्यकता व सेवक ग्रंथमित्र पुरस्कार" या करिता अंतिम निवड करण्यासाठी खालील प्रमाणे राज्यस्तरीय निवड समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | राज्यस्तरीय निवड समिती | पद |
|---|---|---|
| १ | मा. प्रधान सचिव उच्च व तंत्रशिक्षण विभाग | अध्यक्ष |
| २ | अध्यक्ष राज्य ग्रंथालय संघ | सदस्य |
| ३ | ग्रंथालय संचालक | सदस्य सचिव |

९. **पुरस्कार निवड प्रक्रियेचा कार्यक्रम :-**

| अ.क्र. | कार्यक्रम | कालावधी |
|---|---|---|
| १ | ग्रंथालय संचालक यांनी पुरस्कारासाठी वर्तमान पत्रात जाहिरात देणे व सर्व क्षेत्रीय कार्यालयासाठी परीपत्रक निर्गमित करणे. | **१६ ऑगस्ट ते २५ ऑगस्ट** |
| २ | प्रस्ताव प्राप्त करुन घेण्याची अंतिम तारीख. | **१ सप्टेंबर ते १० सप्टेंबर** |
| ३ | जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयाकडे प्राप्त झालेले प्रस्ताव<br>शासन निर्णयातील प्राथमिक अटी तपासून प्रत्यक्ष तपासणी समितीकडे पाठविणे. | **१५ सप्टेंबर ते २० सप्टेंबर** |
| ४ | प्रत्यक्ष तपासणी समितीने (Spot Verification Committee) तपासून गुणांकन करुन अहवाल सादर करणे. | **२१ सप्टेंबर ते १० ऑक्टोंबर** |
| ५ | सहाय्यक ग्रंथालय संचालक यांनी विभागाचा एकत्रित प्रस्ता ग्रंथालय संचालक यांचेकडे पाठविणे. | **११ ऑक्टोंबर ते १५ऑक्टोंबर** |
| ६ | ग्रंथालय (संचालकांनी सर्व विभागांचे प्रस्ताव एकत्रित करुन तपासून अभिप्रायासह राज्यस्तरीय निवड समितीकडे पाठविणे) | **१६ ऑक्टोंबर ते ३१ऑक्टोंबर** |
| ७ | राज्यस्तरीय निवड समितीची बैठक आयोजित करुन पुरस्कारांची निवड करणे. | **१ नोव्हेंबर ते ३० नोव्हेंबर** |
| ८ | पुरस्कार जाहिर करणे. | **माहे.जानेवारी** |
| ९ | पुरस्कार वितरण सोहळा आयोजित करुन पुरस्कार प्रदान करणे | **१४ एप्रिल किंवा १२ ऑगस्ट** |

१०. **पुरस्कारांचे स्वरुप :-** पुरस्कार प्राप्त करणाऱ्या प्रत्येकाला रोख रक्कम, शाल, श्रीफळ आणि प्रमाणपत्र असे राहिल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेताक २०१५०८२७१५३३११९७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Paraji Malikarjun Takate

Digitally signed by Paraji Malikarjun Takate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Paraji Malikarjun Takate
Date: 2015.08.27 15:41:32 +05'30'

**(पा. म. ताकटे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई
३. मा. मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
४. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्रशिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
५. मा. मुख्य सविच यांचे स्वीयसहाय्य, मंत्रालय मुंबई
६. मा. प्रधान सचिव उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीयसहाय्य, मंत्रालय मुंबई

७. महासंचालक माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय मुंबई (व्यापक प्रसिध्दीसाठी)
८. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई/ नागपूर
९. ग्रंथालय संचालक ग्रंथालय संचालनालय मुंबई
१०. सर्व सहाय्यक ग्रंथालय संचालक
११. सर्व जिल्हा ग्रंथालय अधिकारी
१२. निवड नस्ती

**परिशिष्ट "अ"**

**"अ" वर्ग ग्रंथालय**

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर पुरस्कार अर्जासाठी निकष व गुण**

| अ.क्र. | तपशिल | निकष | कमाल गुण | प्रत्यक्ष तपासणी समितीने केलेले गुणांकन | ग्रंथालय संलचालनालय स्तरावर केलेले गुणांकन |
|---|---|---|---|---|---|
| १ | वार्षिक अहवाल | मागील ३ वर्षाचे वार्षिक अहवाल विहीत मुदतीत प्राप्त झाल्यास | १ | | |
| २ | अंकेक्षण अहवाल | मागील ३ वर्षाचे अंकेक्षण अहवाल विहीत मुदतीत प्राप्त झाल्यास | १ | | |
| ३ | अनुदान | मागील ३ वर्षाचे नियमित व पुर्ण अनुदान ग्रंथालयाने घेतले असल्यास | १ | | |
| ४ | ग्रंथसंख्या | **१५००१ च्या वर** प्रत्येक १००० ग्रंथास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २० गुण | २० | | |
| ५ | संगणकीकरण | संगणकीय ग्रंथालय सेवांची उपलब्धता असल्यास | १० | | |
| ६ | संगणक संख्या | ग्रंथालयात सुरु असलेल्या प्रत्येक संगणक संचाकरीता २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| ७ | वृत्तपत्रे | १७ ते २० वृत्तपत्रास १ गुण व २० च्या वर प्रत्येक ५ वृत्तपत्रास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २ गुण | २ | | |
| ८ | नियतकालीके (वार्षिक / दिवाळी अंक वगळून) | ५२ ते **६०** नियतकालिकास १ गुण व ६० च्या वर प्रत्येक १० नियतकालीकास १ गुण जास्तीत जास्त ३ गुण | ३ | | |
| ९ | वर्गणीदार सदस्य | ३०१ च्या पुढील ग्रामीण ग्रंथालयातील ५० व शहरी ग्रंथालयातील १०० सदस्यांकरीता १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| १० | ग्रंथालयाची जागा (प्रत्यक्ष ग्रंथालयांच्या वापरात असलेली जागा | ग्रंथालयाची जागा स्वतःची ५०० ते १००० चौ.फु.पर्यत २ गुण व १००१ च्या वर प्रत्येक ५०० चौ.फु.करीता २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १५गुण | १५ | | |
| ११ | सांस्कृतिक कार्यक्रम | ११ ते १३ सांस्कृतीक कार्यक्रमास १ गुण व १३ च्या वर प्रत्येक ३ सांस्कृतीक कार्याक्रमाकरीता १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ५ गुण (उदा. व्याख्यानमाला, विद्यार्थी विषयक कार्यक्रम , वाचन संस्कृती वाढविणारे उपक्रम, जेष्ठ नागरीकांसाठी कार्यक्रम, महिलांसाठी कार्यक्रम इत्यादी) (कार्यक्रमाचे फोटो व वृत्तपत्र कात्रण प्रस्तावासोबत जोडणे आवश्यक) | ५ | | |
| १२ | ग्रंथ देवघेव | दैनिक सरासरी १०१ ते ११० पर्यत १ गुण पुढील ग्रामीण भागासाठी १० करीता १ गुण व शहरी भागासाठी २० करीता १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| १३ | मागील आर्थिक वर्षातील जमवलेली वर्गणी/ देणगी रक्कम | अनुदान इतकी जमा १ गुण, त्यापेक्षा अधिक जमा २ गुण, याप्रमाणे जास्तीत जास्त २ गुण | २ | | |
| १४ | बैठकींची संख्या | सर्वसाधारण सभा १ गुण व कार्यकारी मंडळाच्या प्रत्येक सभेस १ गुण याप्रमाणे दोन्ही मिळून जास्तीत जास्त ५गुण | ५ | | |
| १५ | राखीव गुण | राज्यस्तरीय समिती | ५ | | |
| | | **एकूण** | **१००** | | |

## परिशिष्ट "ब"

## "ब" वर्ग ग्रंथालय

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर पुरस्कार अर्जासाठी निकष व गुण

| अ.क्र. | तपशिल | निकष | कमाल गुण | प्रत्यक्ष तपासणी समितीने केलेले गुणांकन | ग्रंथालय संलचालनालय स्तरावर केलेले गुणांकण |
|---|---|---|---|---|---|
| १ | वार्षिक अहवाल | मागील ३ वर्षाचे वार्षिक अहवाल विहीत मुदतीत प्राप्त झाल्यास | १ | | |
| २ | अंकेक्षण अहवाल | मागील ३ वर्षाचे अंकेक्षण अहवाल विहीत मुदतीत प्राप्त झाल्यास | १ | | |
| ३ | अनुदान | मागील ३ वर्षाचे नियमित व पुर्ण अनुदान ग्रंथालयाने घेतले असल्यास | १ | | |
| ४ | ग्रंथसंख्या | **५००१ च्या वर** प्रत्येक ५०० ग्रंथास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २० गुण | २० | | |
| ५ | संगणकीकरण | संगणकीय ग्रंथालय सेवांची उपलब्धता असल्यास | १० | | |
| ६ | संगणक संख्या | ग्रंथालयात सुरु असलेल्या प्रत्येक संगणक संचाकरीत २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण १ | १० | | |
| ७ | वृत्तपत्रे | ७ ते १० वृत्तपत्रास १ गुण व १० च्या वर प्रत्येक ५ वृत्तपत्रास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २ गुण | २ | | |
| ८ | नियतकालीके (वार्षिक /दिवाळी अंक वगळून) | १७ ते २० नियतकालिकास १ गुण व २० च्या वर प्रत्येक १० नियतकालीकास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ३ गुण | ३ | | |
| ९ | वर्गणीदार सदस्य | १०१ च्या पुढील ग्रामीण ग्रंथालयातील २५ व शहरी ग्रंथालयातील ५० सदस्यांकरीता १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| १० | ग्रंथालयाची जागा (प्रत्यक्ष ग्रंथालयांच्या वापरात असलेली जागा | ग्रंथालयाची जागा स्वता:ची/भाडयाची ४०० ते ६०० चौ.फु.पर्यत २ गुण व ६०१ च्या वर प्रत्येक २००चौ.फु. करीता २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १५गुण | १५ | | |
| ११ | सांस्कृतिक कार्यक्रम | ५ ते ८ सांस्कृतिक कार्यक्रमास १ गुण व ८ च्या वर प्रत्येक ३ सांस्कृतिक कार्याक्रम करीता १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ५ गुण (उदा. व्याख्यानमाला, विद्यार्थी विषयक कार्यक्रम, वाचन संस्कृती वाढविणारे उपक्रम, जेष्ठ नागरीकांसाठी कार्यक्रम, महिलांसाठी कार्यक्रम इत्यादी) (कार्यक्रमाचे फोटो व वृत्तपत्र कात्रण प्रस्तावासोबत जोडणे आवश्यक) | ५ | | |
| १२ | ग्रंथ देवघेव | दैनिक सरासरी ७५ ते १०० पर्यत १ गुण पुढील ग्रामीण भागासाठी ८ करीता १ गुण व शहरी भागासाठी १० करीता गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| १३ | मागील आर्थिक वर्षातील जमवलेली वर्गणी/ देणगी रक्कम | अनुदान इतकी जमा १ गुण त्यापेक्षा अधिक जमा २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २गुण | २ | | |
| १४ | बैठकींची संख्या | सर्वसाधारण सभा १ गुण व कार्यकारी मंडळाच्या प्रत्येक सभेस १ गुण याप्रमाणे दोन्ही मिळून जास्तीत जास्त ५गुण | ५ | | |
| १५ | राखीव गुण | राज्यस्तरीय समिती | ५ | | |
| | | **एकूण** | १०० | | |

**परिशिष्ट “क”**

**“क”वर्ग ग्रंथालय**

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर पुरस्कार अर्जासाठी निकष व गुण**

| अ.क्र. | तपशिल | निकष | कमाल गुण | प्रत्यक्ष तपासणी समितीने केलेले गुणांकन | ग्रंथालय संलचालनालय स्तराव केलेले गुणांकण |
|---|---|---|---|---|---|
| १ | वार्षिक अहवाल | मागील ३ वर्षाचे वार्षिक अहवाल विहीत मुदतीत प्राप्त झाल्यास | १ | | |
| २ | अंकेक्षण अहवाल | मागील ३ वर्षाचे अंकेक्षण अहवाल विहीत मुदतीत प्राप्त झाल्यास | १ | | |
| ३ | अनुदान | मागील ३ वर्षाचे नियमित व पुर्ण अनुदान ग्रंथालयाने घेतले असल्यास | १ | | |
| ४ | ग्रंथसंख्या | **१००१ च्या वर** प्रत्येक ३०० ग्रंथास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २५ गुण | २५ | | |
| ५ | संगणकीकरण | संगणकीय ग्रंथालय सेवांची उपलब्धता असल्यास | १० | | |
| ६ | संगणक संख्या | ग्रंथालयात सुरु असलेल्या प्रत्येक संगणक संचाकरीत २ गु याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण १ | १० | | |
| ७ | वृत्तपत्रे | ५ ते ८ वृत्तपत्रास १ गुण व **८ च्या** वर प्रत्येक २ वृत्तपत्रास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २ गुण | २ | | |
| ८ | नियतकालीके (वार्षिव /दिवाळी अंक वगळून | ७ ते १० नियतकालिकास १ गुण व १० च्या वर प्रत्येक ५ नियतकालीकास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ३ गुण | ३ | | |
| ९ | वर्गणीदार सदस्य | ५१ च्या पुढील ग्रामीण ग्रंथालयातील १५ व शहरी ग्रंथालयातील<br>३० सदस्यांकरीता १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| १० | ग्रंथालयाची जागा (प्रत्यक्ष ग्रंथालयांच्या वापरात असलेली जागा) | ग्रंथालयाची जागा स्वता:ची/ भाडयाची ३०० ते ५०० चौ.फु.पर्यत २ गुण व ५०१ च्या वर प्रत्येक १००चौ.फु. करीता २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १५गुण | १५ | | |
| ११ | ग्रंथ देवघेव | दैनिक सरासरी ५० ते ७५ पर्यत १ गुण पुढील ग्रामीण भागासाठी ५ करीता १ गुण व शहरी भागासाठी १० करीत १<br>गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| १२ | मागील आर्थिक वर्षातील जमवलेली वर्गणी/ देणगी रक्कम | अनुदान इतकी जमा १ गुण त्यापेक्षा अधिक जमा २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २ गुण | २ | | |
| १३ | बैठकींची संख्या | सर्वसाधारण सभा १ गुण व कार्यकारी मंडळाच्या प्रत्येक सभेस १ गुण याप्रमाणे दोन्ही मिळून जास्तीत जास्त ५गुण | ५ | | |
| १४ | राखीव गुण | राज्यस्तरीय समिती | ५ | - | |
| | | **एकूण** | १०० | | |

## परिशिष्ट "ड"

## "ड"वर्ग ग्रंथालय

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर पुरस्कार अर्जासाठी निकष व गुण

| अ.क्र. | तपशिल | निकष | कमाल गुण | प्रत्यक्ष तपासणी समितीने केलेले गुणांकन | ग्रंथालय संलचालनालय स्तरावर केलेले गुणांकण |
|---|---|---|---|---|---|
| १ | वार्षिक अहवाल | मागील ३ वर्षाचे वार्षिक अहवाल विहीत मुदतीत प्राप्त झाल्यास | १ | | |
| २ | अंकेक्षण अहवाल | मागील ३ वर्षाचे अंकेक्षण अहवाल विहीत मुदतीत प्राप्त झाल्यास | १ | | |
| ३ | अनुदान | मागील ३ वर्षाचे नियमित व पुर्ण अनुदान ग्रंथालयाने घेतले असल्यास | १ | | |
| ४ | ग्रंथसंख्या | **३०१ च्या वर** प्रत्येक २०० ग्रंथास **१** गुण याप्रमाणे जास्तीत जास्त **२५** गुण | २५ | | |
| ५ | संगणकीकरण | संगणकीय ग्रंथालय सेवांची उपलब्धता असल्यास | १० | | |
| ६ | संगणक संख्या | ग्रंथालयात सुरु असलेल्या प्रत्येक संगणक संचाकरीत २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण **१** | १० | | |
| ७ | वृत्तपत्रे | ५ ते **७** वृत्तपत्रास १ गुण व **७ च्या** वर प्रत्येक २ वृत्तपत्रास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २ गुण | २ | | |
| ८ | नियतकालीके (वार्षिक /दिवाळी अंक वगळून) | **७** ते **१०** नियतकालिकास १ गुण व १० च्या वर प्रत्येक ३ नियतकालीकास **१** गुण याप्रमाणे जास्तीत जास्त **३** गुण | ३ | | |
| ९ | वर्गणीदार सदस्य | २६ च्या पुढील ग्रामीण ग्रंथालयातील १० व शहरी ग्रंथालयातील २० सदस्यांकरीता **१** गुण याप्रमाणेजास्तीत जास्त **१०** गु | १० | | |
| १० | ग्रंथालयाची जागा (प्रत्यक्ष ग्रंथालयांच्या वापरात असलेली जाग | ग्रंथालयाची जागा स्वता:ची/ भाडयाची २०० ते ४००चौ.फु. पर्यत २ गुण व ४०१ च्या वर प्रत्येक ५०चौ.फु. करीता २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १५गुण | १५ | | |
| ११ | ग्रंथ देवघेव | दैनिक सरासरी ३० ते ५० पर्यत १ गुण पुढील ग्रामीण भागासाठी ३ करीता १ गुण व शहरी भागासाठी ५ करीत १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| १२ | मागील आर्थिक वर्षातील जमवलेली वर्गणी/ देणगी रक्कम | अनुदान इतकी जमा **१** गुण त्यापेक्षा अधिक जमा **२** याप्रमाणे गुण जास्तीत जास्त २गुण | २ | | |
| १३ | बैठकींची संख्या | सर्वसाधारण सभा **१** गुण व कार्यकारी मंडळाच्या प्रत्येक सभेस **१** गुण याप्रमाणे दोन्ही मिळून जास्तीत जास्त ५गुण | ५ | | |
| १४ | राखीव गुण | राज्यस्तरीय समिती | **५** | - | |
| | | **एकूण** | **१००** | | |

परिशिष्ट “इ”

डॉ. एस.आर. रंगनाथन पुरस्कार अर्जासाठी निकष व गुण

कार्यकर्ता

अ) कार्यकर्ताची वैयक्तीक माहिती

१) कार्यकर्त्याचे नांव व संपूर्ण पत्ता

२) दुरध्वनी क्रमांक

३) जन्म तारीख व वय

४) शैक्षणिक पात्रता

| अ.क्र. | तपशिल | निकष | कमाल गुण | प्रत्यक्ष तपासणी समितीने केलेले गुणांकन | ग्रंथालय संचालनालय स्तरावर केलेले गुणांकन |
|---|---|---|---|---|---|
| १ | सार्वजनिक ग्रंथालय क्षेत्राशी असलेला संबंध/ राज्यातील सार्वजनिक ग्रंथालय चळवळीतील सहभाग | १६ वर्षाकरिता १० गुण व पुढील प्रत्येक वर्षास २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २० गुण | २० | | |
| २ | ग्रंथालयशास्त्र व ग्रंथालय चळवळ विषयक लेख | प्रत्येक लेखास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ५ गुण | ५ | | |
| ३ | ग्रंथालयशास्त्र व ग्रंथालय चळवळ विषयक छापील ग्रंथ | प्रत्येक छापिल ग्रंथास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ५ गुण | ५ | | |
| ४ | सार्वजनिक ग्रंथालयातील संचालक मंडळातील पदाधिकारी/सदस्य | संस्थापक २ गुण, अध्यक्ष अथवा उपाध्यक्ष २ गुण, कार्यवाह अथवा सचिव २ गुण, सदस्य १ गुण, याप्रमाणे जास्तीत जास्त १०गुण | १० | | |
| ५ | शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या जिल्हा/विभाग व राज्य ग्रंथालय संघाच्या संचालक मंडळातील (आजी/माजी व विद्यमान पदाधिकारी/सदस्य) | जिल्हा संघ पदाधिकारी /सदस्य ५ गुण, विभाग संघ पदाधिकारी / सदस्य ७ गुण, राज्य संघ पदाधिकारी / सदस्य १० गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| ६ | ग्रंथालयशास्त्र व ग्रंथालय चळवळ विषयक प्रत्यक्ष सहभाग | प्रत्येक शिबीरे,चर्चासत्रे,कार्यशाळा, अधिवेशने व प्रशिक्षण याकरिता प्रत्येकी २ याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| ७ | शासनमान्य ग्रंथालय वर्गाच्या व्यवस्थापनातील सहभाग | व्यवस्थापक /वर्गशिक्षक ५ गुण, शिक्षक ५ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ५ गुण | ५ | | |
| ८ | संगणक वापरावयाचे ज्ञान | MS-CIT किंवा तत्सम संगणकाचे प्रशिक्षण पूर्ण करुन प्रत्यक्ष संगणकावर काम करीत असल्यास १० गुण | १० | | |
| ९ | पुरस्कार - (नोंदणीकृत संस्थेकडून प्राप्त झालेले कला,संस्कृती,क्रिडा, साहित्य,ग्रंथालय व शिक्षण इ.विषयक असल्यासच) | मिळालेल्या प्रत्येक अन्य पुरस्कारासाठी २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| १० | सेवाकार्य | निरलस सेवाकार्य व जनमाणसातील एकूण प्रतिमा | १० | | |
| ११ | राखीव गुण | राज्यस्तरीय समिती | ५ | - | |
| | एकूण | | १०० | | |

परिशिष्ट “फ”

डॉ. एस.आर. रंगनाथन पुरस्कार अर्जासाठी निकष व गुण

सेवक

अ) सेवकाची वैयक्तीक माहिती
१) सेवकाचे नांव
२ दुरध्वनी क्रमांक
३) संपूर्ण पत्ता
४) जन्म तारीख व वय
५) शैक्षणिक पात्रता

| अ.क्र. | तपशिल | निकष | कमाल गुण | प्रत्यक्ष तपासणी समितीने केलेले गुणांकन | ग्रंथालय संलचालनालय स्तरावर केलेले गुणांकण |
|---|---|---|---|---|---|
| १ | सार्वजनिक ग्रंथालय क्षेत्राशी असलेला संबंध/ राज्यातील सार्वजनिक ग्रंथालय चळवळीतील सहभाग | १६ वर्षाकरिता ५ गुण पुढील प्रत्येक वर्षास २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त २० गुण | २० | | |
| २ | ग्रंथालयशास्त्र व ग्रंथालय चळवळ विषयक लेख | प्रत्येक लेखास १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ५ गुण | ५ | | |
| ३ | ग्रंथालयशास्त्र व ग्रंथालय चळवळ विषयक प्रकाशन | प्रत्येक ग्रंथास १गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ५ गुण | ५ | | |
| ४ | शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयातील विद्यमान पद | ग्रंथपाल १० गुण सहाय्यक ग्रंथपाल ५ गुण निर्गम सहाय्यक ४ गुण लिपिक ३ गुण आणि शिपाई २ गुण | १० | | |
| ५ | शैक्षणिक अर्हता | एस. एस. सी...........................२ गुण<br>एल.टी.सी. (ग्रं.प्र.परीक्षा)............२ गुण<br>पद्वीधर ................................२ गुण<br>पदव्युत्तर पदवी .......................२ गुण<br>गुंथालय शास्त्र पदवी ...............२ गुण<br>(B.Lib.I.Sc.)<br>ग्रंथालय शास्त्र पदव्युत्तर पदवी ..२ ग्रुण<br>(M.Lib.I.Sc.)<br>संगणक प्रशिक्षण .....................२ गुण<br>(MSCIT किंवा तत्सम)<br>याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| ६ | नवीन शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालय स्थापना | नविन ग्रंथालय स्थापनेसाठी केलेले प्रयत्न , इ. प्रत्येक ग्रंथालयाकरिता १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ५ गुण | ५ | | |
| ७ | ग्रंथालयशास्त्र व ग्रंथालय चळवळ विषयक प्रत्यक्ष सहभाग | प्रत्येक शिबीरे,चर्चासत्रे,कार्यशाळा, अधिवेशने व प्रशिक्षण याकरिता प्रत्येकी १ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त ५ गुण | ५ | | |
| ८ | शासनमान्य ग्रंथालय वर्गाच्या व्यवस्थापनातील सहभाग | व्यवस्थापक/वर्गशिक्षक ५ गुण, शिक्षक ५ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| ९ | संगणक वापरावयाचे ज्ञान | MS-CIT किंवा तत्सम संगणकाचे प्रशिक्षण पूर्ण करुन प्रत्यक्ष संगणकावर काम करीत असल्यास १० गुण | १० | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १० | पुरस्कार -(नोंदणीकृत संस्थेकडून प्राप्त झालेले कला,संस्कृती,क्रिडा, साहित्य,ग्रंथालय व शिक्षण इ.विषयक असल्यासच) | मिळालेल्या प्रत्येक अन्य पुरस्कारासाठी २ गुण याप्रमाणे जास्तीत जास्त १० गुण | १० | | |
| ११ | सेवाकार्य | निरलस सेवाकार्य व जनमाणसातील एकूण प्रतिमा | ५ | | |
| १२ | राखीव गुण | राज्यस्तरीय समिती | ५ | | |
| एकूण | | | १०० | | |

**परिशिष्ट एक**

**महाराष्ट्र शासन**

**महाराष्ट्र राज्य उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय योजना : डॉ. बाबासाहेब आंबेडकर पुरस्कार**

**अर्जाचा नमुना**

(**सूचना**: १. पुरस्कार अर्जाचा नमुना शहरी व ग्रामीण विभागांतील ग्रंथालयांकरिता आहे.
२. अर्जातील कोणतीही बाब अनुत्तरीत ठेऊ नये.
३. अर्जात माहिती भरल्याप्रमाणे आवश्यक ती सहपत्रे पृष्ठांकनासह सोबत जोडावीत)

**१) ग्रंथालयाचे नांव** :

**२) ग्रंथालयाचा पूर्ण पत्ता** :

**३) ग्रंथालयाचा संपर्क** : १. दूरध्वनी क्रमांक -
२. भ्रमणध्वनी क्रमांक -

**४) ग्रंथालयाचा दर्जा/वर्ग** :

| -दर्जा | वर्ग |
|---|---|
| जिल्हा | अ/ब |
| तालुका | अ/ब/क |
| इतर | अ/ब/क/ड |

**५) ग्रंथालय कोणत्या भागातील आहे** : शहरी /ग्रामीण.
अ) शहरी असल्यास नगरपालिकेचा वर्ग :-

**६) संस्था नोंदणी क्रमांक** (नोंदणी प्रमाणपत्राची छायांकीत प्रत जोडावी ):-
अ) नोंदणी क्रमांक (एक)
ब) नोंदणी क्रमांक (दोन)

**७) अ) ग्रंथालय स्थापनेचे वर्ष** :-
**ब) ग्रंथालयास शासन मान्यता मिळाल्याचे वर्ष** :-
**क) ग्रंथालयास विद्यमान वर्ग मिळाल्याचे वर्ष** :-

**८) मागील तीन वर्षापासून आवश्यक सर्व विवरणपत्रांसह वार्षिक अहवाल विहित मुदतीत संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयाकडे सादर केला आहे काय?**

**अ) सन होय/नाही**
**ब) सन होय/नाही**
**क) सन होय/नाही**

**९) मागील तीन वर्षापासून आवश्यक सर्व विवरणपत्रांसह अंकेक्षण अहवाल विहित मुदतीत संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयाकडे सादर केला आहे काय?**

**अ) सन होय/नाही**
**ब) सन होय/नाही**
**क) सन होय/नाही**

**१०) मागील तीन वर्षापासून ग्रंथालयाने नियमित व पूर्ण अनुदान घेतले आहे काय?**

अ) सन- होय /नाही प्राप्त एकूण अनुदान रु.
ब) सन- होय /नाही प्राप्त एकूण अनुदान रु.
क) सन- होय /नाही प्राप्त एकूण अनुदान रु.

**११) ग्रंथालयातील मार्च अखेर एकूण ग्रंथसंख्या §शेवटचा नोंदणी क्रमांक द्यावा :**

अ) यापैकी किंमत वसुल झालेली ग्रंथसंख्या :

ब) यापैकी रद्द करण्यात आलेली ग्रंथसंख्या :

क) गहाळ/हरविल्याने किंमत वसूल ग्रंथसंख्या :

**१२) ग्रंथालयाचे कामकाजात /सेवांत संगणकाचा वापर करण्यात येतो काय?**

क) संगणक संख्या :

ख) प्रिंटर संख्या :

ग) ग्रंथालयीन सेवांचे संगणकीकरण झालेले आहे काय? :

घ) असल्यास संगणकीकरण सेवांची माहिती :

च) संगणक वापरात असलेल्या आज्ञावलीचे नाव :

छ) इंटरनेट सुविधा : आहे/नाही

ज) संगणकाच्या माध्यमातून इतर अन्य कोणत्या सेवा सभासद तथा वाचक यांना दिल्या जातात :

**१३) ग्रंथालयात येणारी नियतकालिके (वार्षिके वगळून) :**

(संख्या देऊन सोबत यादी जोडावी)

| अ.क्र | प्रकार | मराठी | हिंदी | | इंग्रजी | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | दैनिके | | | | | | |
| २ | साप्ताहिके | | | | | | |
| ३ | पाक्षिके | | | | | | |
| ४ | मासिके | | | | | | |

**१४) मार्च अखेर ग्रंथालयातील सभासदांची संख्या** :

क) आजीव सभासद :
ख) वार्षिक वर्गणी भरणारे सभासद :
क) अंशकाल वर्गणी भरणारे सभासद :

**१५) ग्रंथालयाच्या इमारतीचा तपशील** :
(मालकीची/लीजवर घेतलेली/विनामुल्य/**भाडयाची**)

**१६) ग्रंथालयाच्या प्रत्यक्ष वापरात असलेल्या इमारतीचे एकूण क्षेत्रफळ(चौ.फुट):**

**१७) ग्रंथालयातील विभागांचा तपशील**

१) ग्रंथ संग्रह विभाग ................ चौ.फुट .
२) सामान्य वाचन विभाग ................ चौ.फुट .
३) ग्रंथ देवघेव विभाग ................ चौ.फुट .
४) कार्यालय ................ चौ.फुट
५) बाल विभाग ................ चौ.फुट .
६) महिला विभाग ........... चौ.फुट .
७) ज्येष्ठ नागरीक विभाग ......... चौ.फुट .
८) संदर्भ विभाग ................ चौ.फुट .
९) अन्य उपक्रमांसाठी असलेली इमारत जागा ......... चौ.फुट .
१०) ग्रंथालयाने भाडेपट्टयाने दिलेली इमारत ......... चौ.फुट .
जागा व तिचे वार्षिक उत्पन्न

१८) **ग्रंथालयातर्फे साजरे केले जाणारे सांस्कृतिक कार्यक्रम** :

**१९) ग्रंथालयाचे वर्षातील कामाचे दिवस संख्या** :
अ) ग्रंथालयाने व्यक्ती सभासदांना वर्षभरात दिलेल्या ग्रंथांची दैनिक सरासरी :
ब) ग्रंथालयाने संस्था सभासदांना दिलेल्या ग्रंथांची दैनिक सरासरी :
क) ग्रंथालयाने फिरत्या ग्रंथालयाच्या माध्यमातून सभासदांना वर्षभरात दिलेल्या ग्रंथांची दैनिक सरासरी (एकूण देवघेव, केंद्रसंख्या, केंद्र सभासद, कामाचे दिवस यासह) :

**२०) मागील आर्थिक वर्षात जमविलेली एकूण रक्कम** :
अ) वर्गणी -
ब) देणगी -

**२१) बैठकीची संख्या** :
अ)सर्वसाधारण सभा
ब)कार्यकारी मंडळाची सभा
क)विशेष सभा
ड) इतर

**२२) याशिवाय अन्य नाविन्यपूर्ण उपक्रम / पुरस्कार वा काही माहिती असल्यास नमूद करुन त्यासंबंधीचे कागदपत्रेही प्रस्तावासोबत सादर करावीत** :

**टीप :-** १. संस्थेच्या नोंदणी प्रमाणपत्रांची छायांकित प्रत जोडावी.
२. ग्रंथालयास मान्यता मिळाल्याबाबतचे आदेशाची छायांकित प्रत जोडावी.
३. ग्रंथालयास विद्यमान वर्ग प्राप्त झाल्याबाबतचे पत्राची छायांकित प्रत जोडावी.
४. मागील तीन वर्षाच्या वार्षिक अहवालाची छायांकित प्रत जोडावी.
५. मागील तीन वर्षाच्या अंकेक्षण अहवालाची छायांकित प्रत जोडवी.
६. ग्रंथालयातर्फे साजरे केलेल्या सांस्कृतिक कार्यक्रमाचे पुरावे.

**परिशिष्ट दोन**

**महाराष्ट्र शासन**

**डॉ.बाबासाहेब आंबेडकर पुरस्कारासाठी हमीपत्र व प्रमाणपत्राचा नमुना**

**शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयाकरिता हमीपत्र**

आम्ही खालील सही करणार प्रमाणित करतो की, शासनाकडून दिल्या जाणाऱ्या पुरस्कारासाठी सादर केलेल्या प्रस्तावातील माहिती ग्रंथालयाच्या अभिलेख्यांवरुन भरलेली असून ती बरोबर आहे. तसेच, सोबत जोडलेली आवश्यक ती सहपत्रे सत्य असल्याची खात्री करण्यात आलेली आहे. तथापि, पुरस्कारप्रक्रियेच्या कोणत्याही टप्प्यावर माहिती खोटी व दिशाभूल करणारी आढळल्यास त्यास आम्ही जबाबदार आहोत असे हमीपत्र देत आहोत. यावरुन पुरस्कार प्रक्रियेतून अर्ज नाकारण्यास व कार्यवाही करण्यास आमची कोणतीही हरकत राहणार नाही.

**ग्रंथालयाचा शिक्का** **स्वाक्षरी** **स्वाक्षरी**

**(अध्यक्षाचे संपूर्ण नाव)** **(सचिवाचे संपूर्ण नाव)**

---

**जिल्हा ग्रंथालय अधिकारी यांचे कार्यालयाकरिता**

उपरोक्त प्रस्तावांतर्गत माहितीची तपासणी ग्रंथालयाच्या अभिलेख्यावरुन करण्यात आली असून, ती सत्य असल्याचे /तीत बदल असल्याचे आढळले. (बदल असल्यास त्यांचे संक्षिप्त विवरण द्यावे)

**जिल्हा ग्रंथालय अधिकारी/जिल्हा ग्रंथपाल**

---

**प्रत्यक्ष तपासणी समितीचे प्रमाणपत्र**

डॉ.बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कारासाठी अर्ज केलेल्या प्रस्तावापैकी प्रत्यक्ष तपासणी समितीस अभिलेख्यावरुन खात्री पटलेल्या ---------------------------------------- ---------------------------------------------------------------------- सार्वजनिक ग्रंथालयाची प्रत्यक्ष तपासणी समितीमार्फत दि.----------------- रोजी करण्यात आली. प्रत्यक्ष तपासणीमध्ये सदर ग्रंथालय पुरस्कारासाठी पात्र/अपात्र असल्याचे दिसून आले.

**अध्यक्ष** **सदस्य सचिव**

**(सहाय्यक ग्रंथालय संचालक)** **(जिल्हा ग्रंथालय अधिकारी/जिल्हा ग्रंथपाल)**

**विभागीय ग्रंथालय संघ सदस्य** **जिल्हा ग्रंथालय संघ सदस्य**

**निरिक्षक/तांत्रिक सहाय्यक**

**ग्रंथालय संचालनालयाकरिता**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट ग्रंथालय पुरस्कारासाठी प्रत्यक्ष तपासणी समितीस आढळून आलेल्या पात्र ग्रंथालयांचा प्रस्ताव गुणांकणासह राज्यस्तरावरील पुरस्कार समितीपुढे पुढील कार्यवाहीस्तव सादर करण्यात येत आहे.

**निरिक्षक/ तांत्रिक सहाय्यक** **सहाय्यक ग्रंथालय संचालक** **ग्रंथालय संचालक**

## परिशिष्ट तीन
## महाराष्ट्र शासन
## डॉ. एस. आर. रंगनाथन् उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता/सेवक/ग्रंथमित्र पुरस्कार
## अर्जाचा नमुना

(**सूचना :** १.पुरस्कार अर्जाचा नमुना ग्रंथालय कार्यकर्ता व सेवकासाठी आहे.
२. अर्जातील कोणतीही बाब अनुत्तरीत ठेऊ नये.
३.अर्जात माहिती भरल्याप्रमाणे आवश्यक ती सहपत्रे पृष्ठांकनासह सोबत जोडावीत.

**१.संपूर्ण नाव :-**
**२.वय व जन्मतारीख :-**
**३.शैक्षणिक पात्रता :-**
**४.पत्रव्यवहाराचा पत्ता :-**
**५. दूरध्वनी व भ्रमणध्वनी क्रमांक :-**
**६.ग्रंथालय चळवळीतील सहभागाचा कालावधी :-**
**७.ग्रंथालयामधील सेवकाचे पद व सेवेचा कालावधी :-**
**८.ग्रंथालयशास्त्र व चळवळीविषयक लिहिलेले लेख/प्रकाशने :-**
**९.सार्वजनिक ग्रंथालयाचे पदाधिकारी असल्यास :-**
१. ग्रंथालयाचे नाव व दर्जा :-
२. पद व कालावधी : -
**१०. ग्रंथालय संघाचे पदाधिकारी असल्यास :-**
१. संघाचे नाव :-
२. पद व कालावधी :-
**११.अ) नवीन ग्रंथालयांची स्थापना केली असल्यास ग्रंथालयांची संख्या :-**
**ब) गाव तेथे ग्रंथालय प्रबोधन मोहिम राबविणे, प्रबोधन कार्यक्रम इ. संख्या :-**
**१२. विविध उपक्रमांतील कृतीशिल सहभाग :-**
१) शिबीर ४) अधिवेशन
२) चर्चासत्र ५) प्रशिक्षणे
३) कार्यशाळा ६) अन्य
**१३.जिल्हयातील ग्रंथपालन वर्गाच्या कामांशी असलेला संबंध**
**उदा. वर्ग व्यवस्थापक, शिक्षक इ. (पदनाम व कालावधी) :-**
**१४. याशिवाय नाविन्यपूर्ण व इतर पुरस्कार/महत्वपूर्ण नोंदी -**
**(त्यासंबंधीचे कागदपत्रे प्रस्तावासोबत जोडणे आवश्यक)**

---

**टीप :-** १) ग्रंथालयशास्त्र व चळवळीविषयी प्रकाशित केलेल्या साहित्याची छायांकित प्रत जोडावी.
२) नवीन ग्रंथालयाची स्थापना केली असल्यास त्याबाबतचा तपशील जोडावा.
३) प्रबोधन कार्यक्रम राबविला असल्यास त्याबाबतचा तपशील जोडावा.
४) विविध उपक्रमांतर्गत सहभाग असल्यास त्याबाबतची सविस्तर माहिती जोडावी.
५) इतर पुरस्कार व महत्त्वपूर्ण काम असल्यास त्याबाबत पुराव्यासह तपशील जोडावा

परिशिष्ट चार

महाराष्ट्र शासन

**डॉ.एस.आर.रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्याकर्ता/सेवक ग्रंथमित्र पुरस्कारासाठी हमीपत्र व प्रमाणपत्राचा नमुना पुरस्काराकरिता अर्ज करणाऱ्या ग्रंथालय कार्यकर्ता व सेवकांकरिता हमीपत्र.**

मी खालील सही करणार प्रमाणित करतो की, शासनाकडून दिल्या जाणाऱ्या पुरस्कारासाठी सादर केलेल्या प्रस्तावातील माहिती व सोबत जोडलेली आवश्यक ती सहपत्रे सत्य आहेत. तथापि, पुरस्कारप्रक्रियेच्या कोणत्याही टप्प्यावर त्याप्रमाणे सत्य नसल्याचे आढळून वा माहिती खोटी, चुकीची, दिशाभूल करणारी आढळल्यास माझा अर्ज नाकारण्यास व माझ्यावर कार्यवाही करण्यास माझी कोणतीही हरकत राहणार नाही.

ठिकाण :

दिनांक :

**(अर्जदाराच्या संपूर्ण नावासह स्वाक्षरी)**

---

**जिल्हा ग्रंथालय अधिकारी यांचे कार्यालयाकरिता**

डॉ.रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता/सेवक ग्रंथमित्र पुरस्काराच्या प्रस्तावांतर्गत माहितीची तपासणी कार्यकर्ता/सेवकाच्या कार्यालयाच्या अभिलेख्यावरुन करण्यात आली असून, ती सत्य/असत्य असल्याचे आढळून आले.

**जिल्हा ग्रंथालय अधिकारी/जिल्हा ग्रंथपाल**

---

ग्रंथालय संचालनालयाकरिता

डॉ.रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता/सेवक ग्रंथमित्र पुरस्काराच्या प्रस्तावाची राज्यस्तरावरील पुरस्कार समितीपुढे पुढील कार्यवाहीस्तव सादर करण्यास शिफारस करण्यात येत आहे/नाही.

**निरीक्षक/तांत्रिक सहाय्यक** **सहाय्यक ग्रंथालय संचालक** **ग्रंथालय संचालक**